**राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ प्राधान्य कुटूंब योजनेचे पात्र लाभार्थ्यांसाठी निश्चित केलेल्या निकषामध्ये बदल करण्याची बाब तपासण्याकरीता समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०२३/प्र.क्र. १०३ /नापु-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ११ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१. शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. साविव्य-१०९९/ प्र.क्र.८८८६/नापु-२८, दिनांक ०५.११.१९९९
२. शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र.असुका-२०१३/प्र.क्र.३१९/नापु-२२,दिनांक १७.१२.२०१३
३. शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. असुका-२०२१/प्र.क्र.६६/नापु-२२, दिनांक १९.०२.२०२२
४. शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. साविव्य-१००१/प्र.क्र.४८३/नापु-२८, दिनांक ०८.०८.२००१
५. शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. साविव्य-१००५/प्र.क्र.१८०३/नापु-२८, दिनांक २५.०५.२००५
६. शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. शिवाप-२०१३/प्र.क्र.१०५/नापु-२८, दिनांक २९.०६.२०१३
७. शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र.याचिका-२०१२/३३-३१/प्र.क्र.८१(अहवाल)/नापु-२८,दिनांक०४.०२.२०१४
८. शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०२३/प्र.क्र. १०३ /नापु-२८, दिनांक २९.०४.२०२४

**प्रस्तावना –**

शासन निर्णय दि.१७.१२.२०१३ नुसार, राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी निकष ठरवितांना लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत लाभ घेत असलेल्या लाभार्थ्यांपैकी ज्या लाभार्थ्यांनी सन २०११ मध्ये विहित नमुन्यात वार्षिक कौटुंबिक उत्पन्न नमूद केले आहे, त्या उत्पन्नानुसार शहरी भागात कमाल रु. ५९,०००/- पर्यंत वार्षिक कौटुंबिक उत्पन्न असणाऱ्या लाभार्थ्यांचा पात्र लाभार्थी म्हणून व ग्रामीण भागात कमाल रु. ४४,०००/- पर्यंत वार्षिक कौटुंबिक उत्पन्न असणाऱ्या लाभार्थ्यांचा प्राधान्य कुटूंब योजनेचे पात्र लाभार्थी म्हणून समावेश करणेबाबत निर्णय घेण्यात आला आहे. सदर लाभार्थ्यांसाठी निश्चित केलेल्या निकषामध्ये बदल करून सुधारित निकष निश्चित करण्याची बाब तपासण्याकरीता संदर्भाधिन क्र. ८ येथील शासन निर्णयान्वये समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समिती फेरगठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शासन निर्णय दि. १७.१२.२०१३ नुसार, राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी निकष ठरवितांना लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत लाभ घेत असलेल्या लाभार्थ्यांपैकी ज्या लाभार्थ्यांनी सन २०११ मध्ये विहित नमुन्यात वार्षिक कौटुंबिक उत्पन्न नमूद केले आहे, त्या उत्पन्नानुसार शहरी भागात कमाल रु. ५९,०००/- पर्यंत वार्षिक कौटुंबिक उत्पन्न असणाऱ्या लाभार्थ्यांचा पात्र लाभार्थी म्हणून व ग्रामीण भागात कमाल रु. ४४,०००/- पर्यंत वार्षिक कौटुंबिक उत्पन्न असणाऱ्या लाभार्थ्यांचा प्राधान्य कुटूंब योजनेचे पात्र लाभार्थी म्हणून समावेश करणेबाबत निर्णय घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्यापैकी काही धान्य शिल्लक राहते. केंद्र शासनाकडून प्राप्त अन्नधान्य १०० टक्के खर्ची पडेल या बाबत दि. १७.१२.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्धारीत करण्यात आलेल्या प्राधान्य कुटूंब योजनेच्या ग्रामीण व शहरी लाभार्थ्यांच्या वार्षिक उत्पन्नाच्या मर्यादेचे निकष तपासणे हा शासनाचा हेतू आहे.

त्या अनुषंगाने इतर राज्यातील प्राधान्य योजनेचे निकष, तसेच सामाजिक निकष याबाबत परिपूर्ण अभ्यास करून प्राधान्य कुटुंब योजनेच्या ग्रामीण व शहरी लाभार्थ्यांसाठी सुधारित निकष निश्चित करण्याची बाब तपासण्याकरीता संदर्भाधिन क्र.८ येथील शासन निर्णयान्वये गठीत केलेली समिती खालीलप्रमाणे फेरगठीत करण्यात येत आहे. सदर फेरगठीत समितीची रचना खालीलप्रमाणे -

| | | |
|---|---|---|
| १. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई | - | अध्यक्ष |
| २. सह/उप सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ३. सह/उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ४. सह/उप सचिव, अन्न नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ५. उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती | - | सदस्य |
| ६.अवर सचिव (नापु-२८),अन्न नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय,मुंबई | - | सदस्य सचिव |

समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे :-

१) इतर राज्यातील प्राधान्य योजनेचे निकष, तसेच सामाजिक निकष याबाबत परिपूर्ण अभ्यास करावा.

२) त्या अनुषंगाने प्राधान्य कुटुंब योजनेच्या ग्रामीण व शहरी लाभार्थ्यांसाठीच्या योजनेच्या निकषांमध्ये काय बदल करणे उचित राहील, याबाबत उपाययोजना सुचवून सुधारीत निकष निश्चित करावेत.

या समितीच्या बैठका नियमित घेण्यात याव्यात व प्राधान्य कुटुंब योजनेच्या ग्रामीण व शहरी लाभार्थ्यांसाठी सुधारित निकष निश्चित काय असावेत ही बाब तपासावी व त्याबाबतचा अहवाल शासनास दोन महिन्यात सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१११५५०१४५४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Depart, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628d01955f3675acc122f51e0c39f63f7cc88eec49cd05616991fd, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2025.04.11 15:51:59 +05'30'

**(ता. मा. कोळेकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव
४. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
६. सर्व विभागीय आयुक्त
७. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई
८. सचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहायक
९. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व उप आयुक्त (पुरवठा)
११. निवड नस्ती (नापु-२८)

*****